राज्य कामगार विमा योजना,
विमाधारक श्री. विलास अ. नारळे,
विमा क्र.-४१७८२६ यांच्या आईवरील
वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वैखप्र-२०१५/प्र.क्र.१२८/१५/राकावि-२,**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकूल इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१,**
**तारीखः- १८ मे, २०१५.**

**वाचा :-**

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र. राकायो-१०९८/२६७६/प्र. क्र. २९०/ ९८/ राकावि-२, दिनांक ६.०५.२००३.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्र.राकायो-१२/प्र.क्र.१९५/१२/राकावि-२, दि.२१.०४.२०१२.**
३) **आयुक्त,राज्य कामगार विमा योजना,मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/ प्रतिपूर्ती/५०/औरंगाबाद/नारळे/१११७-१९/का.क्र.६/१५,दि.२०.०१.२०१५.**
४) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग ,क्र .वैखप्र-२०१३ /प्र.क्र.१२२/ १३/ राकावि-२ दि.०४.०४.२०१३.**

**प्रस्तावना :-**

विमाधारक श्री. विलास अ. नारळे, विमा क्रमांक ४१७८२६ यांच्या आई श्रीमती वसुधा नारळे यांच्याकरिता रुबी हॉल क्लिनिक, पुणे या खाजगी रुग्णालयात INTRACRANIAL BLEED या आजारावर दि.१९/१०/२००९ ते २८/१०/२००९ पर्यंतच्या कालावधीतआंतररुग्ण म्हणून उपचार घेतले आहेत. सदर आजारावरील औषधोपचारासाठी एकूण रुपये-१,५७,६६२/- (रुपये-एक लाख, सत्तावन्न हजार, सहाशे बासष्ठ फक्त ) इतका प्रत्यक्ष खर्च केला असून त्यापैकी अग्राहय देयके वगळून एकूण रूपये-१,१२,२७०/-(रूपये-एक लाख, बारा हजार, दोनशे सत्तर फक्त) इतक्या रकमेचा वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीचा प्रस्ताव मंजुरीसाठी शासनास सादर करण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

वर प्रस्तावनेत नमूद श्री. विलास अ. नारळे, विमा क्रमांक ४१७८२६ यांच्या आईवरील आजारावर केलेल्या औषधोपचारासाठी रुपये-१,५७,६६२/-(रुपये-एक लाख, सत्तावन्न हजार, सहाशे बासष्ठ फक्त ) इतका प्रत्यक्ष खर्च झाला असून त्यापैकी अग्राहय देयके वगळून एकूण

रुपये-१,१२,२७०/-(रूपये-एक लाख, बारा हजार, दोनशे सत्तर फक्त) इतक्या रकमेच्या वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीस या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१५ - २०१६ या आर्थिक वर्षात पुढील लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर - १,

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
१०२ - राज्य कामगार विमा योजना
१०२ (१)-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना
१०२ १-(सी) - वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना
(२२१० १४०२ ) योजनेत्तर

३. हा खर्च राज्य शासन व राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्यात १ : ७ या प्रमाणात विभागण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र ७५०-अ १२/व्यय-१३,दि.१३.१२.२०१२ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार तसेच शा.नि.सा.आ.वि., दि.०४/०४/२०१३ नुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव ( आरोग्य ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१४१२४४५३९९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vijay Sadashiv Brahmane

Digitally signed by Vijay Sadashiv Brahmane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Sadashiv Brahmane
Date: 2015.05.18 11:17:00 +05'30'

( वि.स.ब्राह्मणे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई,

२. संचालक (वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई,

३. वैद्यकीय अधिक्षक, राकावियो रुग्णालय,औरंगाबाद,
(मूळ बिलाच्या प्रतीसह आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या कार्यालया-मार्फत ),

४. महालेखापाल - १ ( लेखा परिक्षा )/ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई,

५. कोषागार कार्यालय, औरंगाबाद,

६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई ,

७. वैद्यकीय आयुक्त, राज्य कामगार विमा महामंडळ, कोटला रोड, नवी दिल्ली,

८. प्रादेशीक संचालक, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदिप भवन, लोअर परेल, मुंबई - १३,

९. वित्त विभाग ( व्यय -१३ ), मंत्रालय, मुंबई,

१०.अर्थसंकल्प शाखा-मुंबई ,मंत्रालय ,सार्वजनिक आरोग्य विभाग ,१,

११.**पत्ता :-** श्री. विलास अनंत नारळे, घर नं.८०, एकनाथ नगर, पीरबाजार जवळ, उस्मानपूरा, औरंगाबाद,

१२.निवड नस्ती ( राकावि - २ ).